ई-साहित्य प्रकाशन

नेटाक्षरी

२१.०९.२००९
अंक : ४४

# षटकार

## ह्या अंकात वाचा..

ऑर्कुटवर सहज सुंदर कवितांच्या एकेरी,दुहेरी धावा काढत
कवितांचा धावफलक हलता ठेवणाऱ्या
सहा दणकेबाज कवींच्या कवितांचे षटकार..



संपादक –

स्वप्ना कोल्हे ( नाशिक )

सहसंपादक –

सोनाली घाटपांडे ( पुणे )
भारती सरमळकर ( मुंबई )
अहं ब्रम्हास्मि ( पुणे )
सचिन काकडे ( मुंबई )

हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी..
netaksharee@gmail.com

# ....ते केस,कापले तिने....

वाट रोजची
वेळ संध्याकाळची
हलकेच नजरानजर
माझं गाडी हळू करणं
तिचे उडते केस
आणि मलाच उडल्यासारखं वाटणं
ते केस,कापले तिने..

कधी स्वैर,लयीत
कधी घट्ट बांधलेले
तरीही भुरभुर विस्कटलेले
फुल चाफ्याचं
बागेतलंच असेल तिच्या
गजरा कधी
त्या काळयाभोर रंगात
शुभ्र पांढरा गजरा
एकदा निसटून
मी तो धडपडत झेलणं
तिनी हसून तो घेणं
पुन्हा माळणं,घट्ट
ते केस,कापले तिने..



माती स्पष्ट जराशी
केसांवर उडलेली
केस सांभाळून फिरणं
तिच्या स्वभावातच नाही ते
नसेल म्हणजे कदाचित
कधी तर चिंब ओले
स्वतःलाच मिठी मारलेले
रेनकोट कधीच नाही
जरासं आभाळ आणि
पावसाला बोलावणारे
ते केस,कापले तिने..

झोप नाही येत
एखाद दिवस
आठवण यायची मग तिची
म्हणजे अशीच असेल
केसांचा गर्द अंधार
आणि तो अलगद स्पर्श
लगेच झोप यायची
ते केस,कापले तिने..

गेल्या महिन्यात
कसलासा कट मारलाय
कट केलाय
आता झोप येते शांत
उडतच नाही
आता काही उडतच नाही
ना तिचे केस,ना मी
ना ठोके
पाऊस पण कमी पडतो
वाटलं सरळ विचारावं,का ?
परवा स्वतःहून बोलली सुध्दा
हॅपी बर्थ डे वगैरे
हिला कुठून कळला असेल ?

पण तरी केस..
ते केस,कापले तिने..

- चिन्मय कानिटकर [ पुणे ]

## ....कॉमर्सच्या भाषेत....

जा जायचंय ना तुला,मग जा..

जातांना तुझं capital घेऊन जा
goodwill मधला तुझा share ही घेऊन जा
partnership firm चं sole trading करून जा
जायचंय ना तुला,मग जा..



सहन केले दोघांनी कधी profit कधी loss
कळालाच नाही कधी कसा आपल्या मध्ये आला cross
सगळ्या books च इतक्या वर्षांचं audit तरी करून जा
जायचंय ना तुला,मग जा..

धंदा आहे,खरं खोटं आलंच
पण बरोबर balance काढलाच नाही
एवढासा difference आता मोठा वाटतो
rectification झालंच नाही
suspense का आला ? ते आता पाहू
interest कुठे गेला ? तेही मग शोधू
posting करून झालंय माझं , casting करून जा
कदाचित शेवटची balance shit..tally करून जा

जायचंय ना तुला,मग जा..

- भाग्यश्री फडके [ मुंबई ]

## ....मोरपिशी साडी....



मेकअप च्या अडगळलेल्या डब्यात
लिपस्टिकचा बोटभर तुकडा शोधून
ओठांशी मस्ती करणाऱ्या आरशामधल्या
पाचफुटी फुला
उगीच का अत्तर लावतोस ?

तुझ्या या मोरपिशी साडीनंच
अत्तर शिंपडलंय या देखाव्यात
निऱ्या घट्ट धरुन ठेवणारी तुझी बोटं
आणि तांबूसकाळया बटांमागचं
कानावरचं हसरं पिवळं फुल
म्हणजे सुगंधाचा कळस !

आहा !
डोळे कधीच बंद झाले तुला हुंगून

बरं आहे,तू घरात आहेस
असाच राहशील कायम
असंच राहील तुझं चैतन्यमयी हास्य
तुझं सोवळेपण
तुझी मोरपिशी साडी
न विस्कटता,न चुरगळता

- चक्रपाणि चिटणीस [ अमेरिका ]

# ....जा गेला उडत....

कितीं प्रेम केलं मी जरी
तरी गेलास ना मला सोडून
जायचं तर जा,गेला उडत
मी पण नाही बघणार मागे वळून
माझं किती प्रेम होतं
किती जीव लावत होते
आता समोर ये कधी
बघ कशी कानाखाली वाजवते
        कुठून बुध्दी आली तुला
        सोडून गेलास असा मध्येच मला
        कावळ्याचीच नजर तुझी
        दुसरी पोरगी दिसली असेल तुला
२ वर्षांच्या प्रेमात
६ शर्ट मी गिफ्ट केले
तुझं दूसरं लफडं तर कळू दे रे फक्त
माझं नाव नाही
जर तुला नाही चौकात उघडे केले
        ज्या बाईकवरुन
        मला फिरवायचास
        कळालं ती बाईक तुझी नव्हती
        मलाच उशीरा जाग आली
        तुझी माझ्याबरोबर
        उभी राहण्याचीही लायकी नव्हती
पोरीला फिरवून आता
तिला सोडून दिलं
असा जर विचार करत असशील तू
माझी हाय लागेल
१० पोरी सोडतील
टाळच पिटत बसशील तू



- स्मिता भरविरकर ( मुंबई )

# ....जुळतात अशीच रे वेडी नवीन नाती....



अनोळखी तू हा भाग अनोळखी
रात्र वादळाची वेड्या पावसाची
वाड्यात ह्या बंदिस्त मी अन
तू असा उभा इथे माझ्यापाशी

कडाडून कोसळली ती वीज
की तुझ्या नेत्रांचे कटाक्ष बोलले
ओल्या वस्त्रात ओलेती मी
नखशिखांत अंग अंग शहारले

वाऱ्याचा झोत बेफान अंगाशी झोंबे
की श्वास तुझा हा माझ्याशी नाते सांगे
बेभान झाले मी नच हे अनोळखी भासे
निसर्गच तो का न ओळखी मला रे

निसर्गकन्या मी अन तू निसर्गपुत्र
हवे कशास मग अजून वेगळे नाते
ज्याने घडविले त्यालाच घडवू दे
जे काय जे आता आहे घडायचे

ना खेद कशास खंत तरी का करावी
संस्कृती,बंधने भाकड सगळया गोष्टी
निसर्गच धर्म कुणी म्हणती त्याला प्रिती
तोडून टाक नाती ना उपयोगा कुणा ती

ये राजसा घेऊनी मजला कर तू प्रिती
जुळतात अशीच रे वेडी नवीन नाती
जुळतात अशीच रे वेडी नवीन नाती

- अतुल दि.पाटील ( पुणे )

## ....तकदीर....

येणार त्या क्षणांचे तकदीर वक्त आहे
आहेत त्या क्षणांना आयुष्य फक्त आहे

स्पर्शात हिरे,पाचू,मोतीच चुंबनात
अनुभूतीचे सुवर्णी धन येथ गुप्त आहे

मज आजवर शिकायत त्यांच्या खिलाफ होती
ही आज खंत,त्यांच्याविना मी मुक्त आहे

शोधित राजरस्ता ती शापभ्रष्ट मंजिल
वरदान काजव्यांचे घाटात लुप्त आहे

आशा उभारणीच्या विसरुन आण-भाका
आपल्याच पडझडीच्या चिंतेत व्यस्त आहे

विमनस्क बाज होता भरोशातल्या नशेला
इल्जाम भोगुनी हा इतिहास नष्ट आहे

कुठल्याच मस्तकी ना सरताज शाश्वतीचा
बेघर सलामतीचे बेताज तख्त आहे




- सोनाली घाटपांडे [ पुणे ]



रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास नेटाक्षरी जोमाने पार पाडीत आहे.दर आठवड्यात मिळणाऱ्या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणित होतोय.नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ४०००० मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो.ह्याव्यतिरिक्त संकेतस्थळाला भेट देऊन अंक वाचणाऱ्यांची संख्या लक्षणीय आहे.हा अंक आपण आपल्या मित्रपरिवारास पाठवण्यास आमची काहीही हरकत नाही.सोबतच,असे करतांना आमच्या ईमेल चा अंर्तभाव केल्यास आम्ही आपले अत्यंत आभारी राहू. मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लागावा ही इच्छा.आपल्यासारख्या रसिकांच्या साह्याने हा अंक एक लक्ष वाचकांपर्यंत पोहचवण्याचा आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

*हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी..*

netaksharee@gmail.com